इतर मागासवर्गीय जातींमधील उन्नत आणि प्रगत व्यक्ती/गट (क्रिमी लेयर) वगळून आरक्षणाचे फायदे देण्याबाबत निकष निश्चित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,

**शासन निर्णय क्रमांक–सीबीसी–1094/प्र.क्र.86/मावक–5,**

**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई 400 032. दिनांक : 5 जून 1997.**

**वाचा :–** शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक–सीबीसी–1094/प्र.क्र.86/ मावक–5, दिनांक 16 जून 1994.

**प्रस्तावना :–** शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक सीबीसी–1094/प्र.क्र.86/ मावक–5, दिनांक 16 जून 1994 अन्वये महाराष्ट्र राज्यातील इतर मागासवर्ग, भटक्या जमातीतील धनगर व वंजारी व त्यांच्या तत्सम जाती या प्रवर्गातील उन्नत आणि प्रगत व्यक्ती/गट वगळून आरक्षणाचे फायदे देण्याबाबत निकष निश्चित करण्यात आले होते.

2. सार्वजनिक उपक्रम, विद्यापीठ, बँका, आयुर्विमा महामंडळ वगैरे मध्ये जे अधिकारी कार्यरत होते त्यांना उत्पन्नाचा निकष लागू केल्यामुळे त्यांच्या पाल्यांना आरक्षणाचा लाभ घेता येत होता. मात्र केंद्र व राज्य शासनाने जे वर्ग–1 या श्रेणीतील अधिकारी, आईवडिल दोन्हीही वर्ग–2 या श्रेणीतील अधिकारी होते व जो अधिकारी सरळ सेवेने वर्ग–2 या श्रेणीमध्ये होता व वयाच्या 40 व्या वर्षापूर्वी वर्ग–1 या श्रेणीमध्ये पदोन्नत झालेला होता. अशा अधिका–यांचे वार्षिक उत्पन्न मागील 3 वर्षामध्ये रुपये 1 लाखाच्या आंत असले तरी त्यांच्या पाल्यांना आरक्षणाचा लाभ घेता येत नव्हता. मात्र सार्वजनिक उपक्रम, विद्यापीठ वगैरेमध्ये जी पदे शासनातील पदांशी समतुल्य असताना देखील बँका व विद्यापीठ येथील अधिका–यांच्या पाल्यांना उत्पन्नाच्या निकषामुळे लाभ घेता येत होता व शासनातील अधिका–यांच्या पाल्यांना त्यांच्या पालकांचा दर्जा निश्चित केल्यामुळे वार्षिक उत्पन्न रुपये 1 लाखाच्या आंत असताना देखील ते फायद्यापासून वंचीत राहिलेले होते. ही विसंगती दूर करण्याच्या दृष्टीने सदरचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

3. आरक्षणाचा लाभ देताना मागील 3 वर्षामध्ये दरवर्षी ज्यांचे वार्षिक उत्पन्न रुपये 1 लाख किंवा त्यापेक्षा जास्त आहे अशा प्रकारचा निकष निश्चित केला होता. दर 3 वर्षांनी रुपयाचे मूल्य विचारात घेवून त्यामध्ये बदल होऊ शकतो, याचा विचार करुन उत्पन्नाच्या निकषाची मर्यादा बदलण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :–** शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक–सीबीसी–1094/ प्र.क्र.86/मावक–5, दिनांक 16 जून 1994 अन्वये केंद्र व राज्य शासनातील वर्ग–1 व वर्ग–2 च्या अधिका–यांना उत्पन्नाचा निकष न लावता त्यांचा केवळ दर्जा हा विचारात घेतला होता. त्यामुळे त्यांचे उत्पन्न रुपये 1 लाखाच्या आंत असले तरी त्यांच्या पाल्यांना फायदा मिळत नव्हता. मात्र विद्यापीठ, बँका, सार्वजनिक उपक्रम येथे शासनातील पदांशी समकक्ष असलेल्या पदावर काम करीत असलेल्यांच्या पाल्यांना मात्र तो फायदा घेता येत होता. ही विसंगती दूर करण्यात येत आहे व राज्य व केंद्र शासनातील वर्ग–1 व वर्ग–2 ह्या श्रेणीतील अधिका–यांना उत्पन्नाचा निकष लागू करण्यात येत आहे.

2. ज्या व्यक्तींचे उत्पन्न मागील 3 वर्षामध्ये रुपये 1 लाखाच्या आंत होते त्यांना आरक्षणाचा लाभ मिळत होता. ही मर्यादा दर 3 वर्षांनी बदलावयाची असल्यामुळे व आता 3 वर्षे पूर्ण झाली असल्याने रुपये 1 लाखावरुन रुपये 2 लाख

4. महाराष्ट्र राज्यातील सवलती व फायदे घेतांना सदरहू उत्पन्नाच्या निकषाच्या आधारे उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्यासह जातीचा दाखला देण्यात यावा.

5. दिनांक 16 जून 1994 च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेले निकष रद्द करुन सोबतच्या परिशिष्टात सुधारीत स्वरुपात उन्नत व प्रगत व्यक्ती/गट ठरविण्याबाबतचे निकष निश्चित करण्यात आले आहेत.

6. महाराष्ट्र राज्यामध्ये जी इतर मागासवर्ग, भटक्या जमातीतील धनगर व वंजारी व त्याच्या तत्सम जाती यांची यादी घोषित केलेली आहे. त्या यादीतील जातीच्या व्यक्तींना महाराष्ट्रातील लाभ घेता येईल. उत्पन्नाचे निकष महाराष्ट्र राज्यातर्फे दिल्या जाणाऱ्या सवलतींकरिता लागू आहेत.

7. केंद्र शासनाचे आरक्षण विषयक फायदे घेतांना उन्नत व प्रगत व्यक्ती/गट याबाबतचे जे निकष केंद्राने लागू केले आहेत व केंद्र शासनाने महाराष्ट्राशी संबंधीत जी इतर मागासवर्गाची यादी निश्चित केली आहे त्यांना लागू राहतील.

8. सदरहू आदेश त्वरित परिणामाने लागू करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

स. नु. गावीत,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-1, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-2, नागपूर,
सर्व विभागीय आयुक्त,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा/अपिल शाखा, मुंबई,
संचालक, समाजकल्याण महाराष्ट्र राज्य पुणे,
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सर्व मंत्रालयीन विभाग,

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना त्याबाबतच्या सूचना द्याव्यात.

सर्व जिल्हा दंडाधिकारी,
सर्व उप विभागीय अधिकारी (महसूल),
सर्व उप जिल्हाधिकारी,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

उन्नत व प्रगत व्यक्ती/गट निश्चित करण्याचे निकष

| वर्गवारीचे वर्णन<br>1 | आरक्षणातून ज्यांना वगळले आहे त्यांची यादी<br>2 | उत्पन्नाचा निकष<br>3 |
|---|---|---|
| (1) सांविधानिक पदे | (अ) भारताचा राष्ट्रपती<br>(ब) भारताचा उपराष्ट्रपती<br>(क) सर्वोच्च न्यायालय व उच्च न्यायालयाचे न्यायाधीश<br>(ड) केंद्रीय लोकसेवा आयोग, राज्य लोकसेवा आयोग, मुख्य निवडणूक आयुक्त, भारताचे नियंत्रक व महालेखा निरीक्षक.<br>(इ) साविधानात नमूद केल्यानुसार तशा प्रकारची धारण केलेली पदे यांची मुले/मुली | |
| (2) सेवाविषयक वर्गवारी<br>(अ) गट "अ"/वर्ग–1 अधिकारी अखिल भारतीय सेवा आणि राज्य सेवा (सरळसेवा) | (1) आई–वडिल दोन्हीही वर्ग–1 ह्या श्रेणीतील अधिकारी आहेत.<br>(2) आई–वडिलांपैकी एकजण वर्ग–1 ह्या श्रेणीतील अधिकारी आहे.<br>(3) आई–वडिल दोन्हीही वर्ग–1 चे अधिकारी आहेत परंतु त्यापैकी एकाचा मृत्यू झालेला आहे किंवा वैद्यकीयदृष्ट्या काम करण्यासाठी असमर्थ ठरविला गेला आहे.<br>(4) आई–वडिलांपैकी एक वर्ग–1 ह्या श्रेणीतील अधिकारी आहे आणि त्यापैकी एकाचा मृत्यू झालेला आहे किंवा कायम स्वरुपी काम करण्यासाठी वैद्यकीयदृष्ट्या अपात्र ठरविले गेले आहे आणि अशी घटना घडण्यापूर्वी, त्यांनी युनोसारख्या आंतरराष्ट्रीय संघटनेकडे कमीत कमी 5 वर्षे काम केलेले आहे.<br>(5) आई–वडिल दोन्ही वर्ग–1 ह्या श्रेणीचे अधिकारी आहेत व दोन्हीही मृत्यू पावले आहेत किंवा कायमस्वरुपी काम करण्यासाठी वैद्यकीयदृष्ट्या अपात्र ठरविले आहेत आणि अशी घटना घडण्यापूर्वी, त्यांनी आंतरराष्ट्रीय संघटनेकडे कमीत कमी 5 वर्षे काम केलेले आहे.<br>(6) आई–वडिलांपैकी दोघेही वर्ग–1 ह्या श्रेणीतील अधिकारी होते आणि दोघांचा मृत्यू झालेला आहे किंवा वैद्यकीय दृष्ट्या कायमस्वरुपी असमर्थ ठरविले आहे. | मागील 3 वर्षांमध्ये प्रत्येक वर्षी, रुपये 2 लाखापेक्षा जास्त उत्पन्न असल्यास त्यांच्या मुला–मुलींना आरक्षण व इतर सोयी सवलती मिळणार नाहीत |
| | (7) जी महिला इतर मागासवर्गापैकी आहे व तिने वर्ग–1 च्या अधिकाऱ्याबरोबर विवाह केलेला आहे तर ती स्वतः आरक्षित असलेल्या पदाकरिता अर्ज करु शकते. | उत्पन्नाचा निकष लागू आहे. |

एक्स-190(सी)(500-4-00)-23

| 1 | 2 | 3 |
|---|---|---|
| (ब) गट "ब" केंद्र व राज्य शासनाचे वर्ग-2 चे अधिकारी "सरळसेवा" | (1) आई-वडिल दोघेही वर्ग-2 ह्या श्रेणीतील अधिकारी आहेत.<br>(2) आई-वडिलांपैकी दोघेही वर्ग-2 ह्या श्रेणीतील अधिकारी होते. त्यापैकी एकाचा मृत्यू झालेला आहे किंवा वैद्यकीयदृष्ट्या काम करण्यास असमर्थ ठरविले गेले आहे आणि अशी घटना घडण्यापूर्वी त्यांनी युनोसारख्या आंतरराष्ट्रीय संघटनेमध्ये 5 वर्षे इतकी सेवा केलेली आहे.<br>(3) आई-वडिलांपैकी एक वर्ग-1 ह्या श्रेणीतील अधिकारी आहे व आई-वडिलांपैकी कोणीही वर्ग-2 ह्या श्रेणीतील अधिकारी होते व ते मृत्यू पावले किंवा काम करण्यास कायमस्वरुपी वैद्यकीयदृष्ट्या असमर्थ ठरविलेले आहेत.<br>(4) आई-वडिलांपैकी दोघेही वर्ग-2 ह्या श्रेणीतील अधिकारी होते. त्यांपैकी एकाचा मृत्यू झाला आहे किंवा कायमस्वरुपी वैद्यकीयदृष्ट्या असमर्थ ठरविले आहे. ही घटना घडण्यापूर्वी जर त्यांनी त्यांपैकी एकाने आंतरराष्ट्रीय संघटनेमध्ये कमीत कमी 5 वर्षे सेवा केली आहे. | मागील 3 वर्षामध्ये प्रत्येक वर्षी, रुपये 2 लाखापेक्षा जास्त उत्पन्न असल्यास त्यांच्या मुला-मुलींना आरक्षण व इतर सोयी सवलती मिळणार नाहीत. |
| (क) सार्वजनिक उपक्रमातील कर्मचारी | वरील प्रवर्गात अ आणि ब येथे विशद केलेले निकष हे योग्य ते बदल करुन योग्य त्या फेरफारासह सार्वजनिक उपक्रम, बँका, विमा संस्था, विद्यापीठे इत्यादी मधील समकक्ष तथा तुलना योग्य पदे धारण करणा-या अधिका-यांना आणि खाजगी व्यवसायातील समकक्ष तथा तुलनायोग्य पदांना, या संस्थांतील समकक्ष तथा तुलना योग्य पदांच्या प्रलंबित पुनर्मुल्यांकनांच्या अधीन राहून. | मागील 3 वर्षामध्ये प्रत्येक वर्षी, रुपये 2 लाखापेक्षा जास्त उत्पन्न असल्यास त्यांच्या मुला-मुलींना आरक्षण व इतर सोयी सवलती मिळणार नाहीत. |
| (3) लष्कर व निम लष्करी दल (नागरी पदे धारण केलेल्या व्यक्तींचा समावेश नाही) | आई-वडिल दोघेही किंवा दोघांपैकी कोणीही एक जर पायदलातील कर्नल किंवा त्यापेक्षा वरच्या पदावर आणि नौदल आणि वायुदल पायदलातील कर्नल किंवा वरच्या पदाशी समकक्ष पदे धारण करणारे आणि निम लष्करी दलात. | मागील 3 वर्षामध्ये प्रत्येक वर्षी, रुपये 2 लाखांपेक्षा जास्त उत्पन्न असल्यास त्यांच्या मुला-मुलींना आरक्षण व इतर सोयी सवलती मिळणार नाहीत |

| 1 | 2 | 3 |
|---|---|---|
| (4) (1) उद्योग व व्यापारात असलेला व्यावसायिक वर्ग | ज्या व्यक्ती डॉक्टर, वकील, चार्टर्ड अकाऊंटंट, आयकर सल्लागार, वित्तीय व व्यवस्थापकीय सल्लागार, शल्यचिकित्सक, अभियांत्रिक, वास्तुशास्त्रज्ञ, संगणकतंत्रज्ञ, चित्रपट कलाकार, लेखक, नाटककार आणि इतर या सारखे व्यावसायिक दर्जा प्राप्त केलेले. | मागील तीन वर्षांमध्ये प्रत्येक वर्षी दोन लाखांपेक्षा जास्त उत्पन्न असल्यास त्यांच्या मुला-मुलींना आरक्षण व इतर सोयी सवलती मिळणार नाहीत |
| (2) व्यापार, धंदा व उद्योगात असलेल्या व्यक्ती. | पती किंवा पत्नीपैकी एकजण व्यवसाय करीत असेल व त्यांपैकी एकजण वर्ग-2 चा अधिकारी किंवा त्या खालच्या पदांवर काम करीत असल्यास व्यवसायाचे उत्पन्न आरक्षणाचा लाभ घेताना उत्पन्न म्हणून समजावयाचे आहे व नोकरी करीत असल्यापासून जे उत्पन्न येईल ते वगळावयाचे आहे. | |
| (5) मालमत्ता धारक<br>(अ) शेत जमीनधारक | (1) कमाल शेती धारणा संदर्भातील अधिनियमातील बागायत क्षेत्रधारणेच्या पात्र मर्यादेच्या 85 टक्के पर्यंत क्षेत्र धारण करणा-या व्यक्तींना उन्नत आणि प्रगत व्यक्ती अथवा गट म्हणून गणले जाणार नाही. | -- |
| | (2) ज्या व्यक्तींच्या धारण केलेल्या क्षेत्रात विहिर बागायत क्षेत्र आहे. त्या व्यक्तींबाबत असे विहिर बागायत क्षेत्र बागायत न धरता जिरायत धरले जाईल. कारण सर्व साधारणतः विहिरी मधून मुबलक स्वरुपात पाणी उपलब्ध होत नाही. म्हणून त्यांना उन्नत आणि प्रगत व्यक्ती/गट गणले जाणार नाही. | -- |
| (ब) बागायतदार | कॉफी, चहा, रबर, आंबा, लिंबू वर्गीय व सफरचंदाचे बागायतदार | मागील 3 वर्षांमध्ये प्रत्येक वर्षी रुपये 2 लाखांपेक्षा जास्त उत्पन्न असल्यास त्यांच्या मुला-मुलींना आरक्षण व इतर सोयी सवलती मिळणार नाहीत |
| (क) रिकामी जागा किंवा नागरी भागातील इमारती किंवा नागरी भागाला जोडून असलेल्या गावातील इमारती धारकांना | इमारत ही राहिवास, औद्योगिक किंवा व्यापार कारणास्तव आणि अशा दोन किंवा दोनपेक्षा अधिक कारणास्तव वापरण्यात यावी. | |

| 1 | 2 | 3 |
|---|---|---|
| (6) ग्रामीण बलुतेदार | ग्राम स्तरावरील बलुतेदार यांना वंशपरंपरागत उद्योग किंवा धंदा करणारी व्यक्ती समजण्यात येवून त्यांना उन्नत आणि प्रगत व्यक्ती/गट समजले जाणार नाही. | — |
| (7) हौशी आणि धंदेवाईक खेळाडू | हौशी खेळाडू आणि क्रीडा क्षेत्रातील धंदेवाईक खेळाडू व्यक्ती यांना उन्नत आणि प्रगत व्यक्ती अथवा गट गणले जाणार नाही. | — |

मुद्रा - १९०(सी)(५००-४-००)-१अ